**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत मदतनीसांना अंगणवाडी सेविका म्हणून पदोन्नती देतेवेळी किंवा अंगणवाडी सेविकेचे रिक्त पद भरतेवेळी प्रभाग पध्दतीची असलेली अट शिथिल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१७/प्र.क्र.३९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ जून, २०१७

**वाचा :-** (१) महिला व बाल कल्याण विभाग ,शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट २०१४

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवायोजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेंतर्गत अंगणवाडयांमधील अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस या मानधनी कर्मचा-यांच्या नियुक्तीसंदर्भात शासनाने विहीत कार्यपध्दती दिनांक १३ ऑगस्ट २०१४ च्या शासन निर्णयान्वये ठरवून दिलेली आहे.

२. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांच्या नियुक्तीच्या शर्ती व अटी शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/ प्र.क्र.४२९/ का.६, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ अन्वये सुधारणा करण्यात आलेली असून सदर शासन निर्णयातील अनुक्रमांक १ (क) नुसार अंगणवाडी सेविकेचे पद रिक्त झाल्यास अथवा या क्षेत्रात नविन अंगणवाडी केंद्र सुरु करावयाचे असल्यास ग्रामीण व आदिवासी भागातील त्या गावात तर नागरी भागातील वॉर्डात / प्रभागात (म्हणजेच नगरसेवकाचे निवडणूक क्षेत्र) कार्यरत अंगणवाडी केंद्राच्या मदतनीसला सेवाज्येष्ठतेप्रमाणे शैक्षणिक अर्हता, स्थानिक रहिवाशी अट व मदतनीस म्हणून दोन वर्षाची सेवा या अटींची पुर्तता करीत असल्यास अंगणवाडी सेविका म्हणून थेट नियुक्ती देण्यात येते. त्या क्षेत्रातील एकापेक्षा जास्त मदतनीसांचा अनुभव कालावधी समान असल्यास जास्त शिक्षण असलेल्या मदतनीसला प्राधान्य देण्यात येते.

३. ज्या अंगणवाडी मदतनीस दहावी परिक्षा उत्तीर्ण झाल्या आहेत व त्यांची दोन वर्षापेक्षा अधिक सेवा झालेली आहे अशा मदतनीसांना अंगणवाडी सेविका म्हणून पदोन्नती देण्यात येते. परंतु शासनाच्या २०१४ च्या परिपत्रकानुसार ज्या प्रभागात अंगणवाडी सेविकेची जागा रिक्त आहे तेथे मदतनीसांना पदोन्नती देतांना ती मदतनीस त्याच प्रभागातील असावी अशी अट घातल्यामुळे नवनिर्मित नगरपंचायत क्षेत्रामध्ये देखील प्रश्न निर्माण होऊन अंगणवाडी मदतनीस अनुभवी व शैक्षणिकदृष्टया पात्र असतानाही त्यांना पदोन्नतीची संधी उपलब्ध होत नसल्याने त्यांच्यावर अन्याय होत असल्याने त्यांची पदोन्नती करतांना ती मदतनीस त्याच प्रभागातील असावी ही अट रद्द करण्याची अंगणवाडी कर्मचारी संघटनेची मागणी होती.प्रभाग समितीची अट शिथिल करण्याची बाब शासनाच्य विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/ प्र.क्र.४२९/ का.६, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ शासन निर्णयातील अनुक्रमांक १ (क) नुसार अंगणवाडी सेविकेचे पद रिक्त झाल्यास अथवा या क्षेत्रात नविन अंगणवाडी केंद्र सुरु करावयाचे असल्यास ग्रामीण व आदिवासी भागातील त्या गावात तर नागरी भागातील वॉर्डात / प्रभागात (म्हणजेच नगरसेवकाचे निवडणूक क्षेत्र) कार्यरत अंगणवाडी केंद्राच्या मदतनीसला सेवाज्येष्ठतेप्रमाणे शैक्षणिक अर्हता, स्थानिक रहिवाशी अट व मदतनीस म्हणून दोन वर्षाची सेवा या अटींची पुर्तता करीत असल्यास अंगणवाडी सेविका म्हणून थेट नियुक्ती देण्यात येते. त्या क्षेत्रातील एकापेक्षा जास्त मदतनीसांचा अनुभव कालावधी समान असल्यास जास्त शिक्षण असलेल्या मदतनीसला प्राधान्य देण्यात येते. अशाप्रकारची प्रभाग पध्दतीची असलेली अट शिथिल करुन **"नगरपंचायत क्षेत्रातील कोणत्याही अंगणवाडी केंद्राच्या अंगणवाडी सेविकेचे रिक्त पद भरतेवेळी त्या नगर पंचायत क्षेत्रातील मदतनिसाला सेवाज्येष्ठतेप्रमाणे रिक्त पदावर अंगणवाडी सेविका म्हणून थेट नियुक्ती देण्यास** "शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२८१५२४०४३६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.06.28 15:20:29 +05'30'

(स्मिता निवतकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य
६. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. सचिव (महिला व बाल कल्याण विभाग), मंत्रालय, मुंबई
८. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (ले.व को),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
१२. सर्व विभागीय आयुक्त
१३. सर्व जिल्हाधिकारी

१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

१५. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका

१८. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास

१९. सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)

२०. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )

२१. सर्व मुख्यधिकारी, नगरपालिका,

२२. सर्व मंत्रालयीन विभाग

२२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर

२३. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद

२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई

२७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२८. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने

२९. निवड नस्ती (कार्यासन ६)